**श्रीमती अनुराधा खानविलकर, उप सचिव, सा.प्र.वि यांचा दिनांक ३०/०७/२०२१ ते २२/१२/२०२१ पर्यंतचा कालावधी हा महाराष्ट्र नागरी सेवा नियम १९८१ (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम ९ (१४) (एफ) नुसार प्रतिक्षेचा कालावधी हा "कर्तव्य कालावधी" म्हणून नियमित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र.-सारथी-२०२१/प्र.क्र ८९/का.१४२५**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,**
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.
दिनांक - ०७ एप्रिल २०२२

<u>वाचाः</u>-१) व्यवस्थापकीय संचालक,छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था,(सारथी) पुणे यांचे दिनांक २३/१२/२०२१ चे पत्र व सहपत्र

**<u>प्रस्तावनाः-</u>**

सामान्य प्रशासन विभाग यांचे आदेश क्रमांक प्रतिनि-१०२१/प्र.क्र.७८/का-१४,दिनांक १५ जुलै २०२१ च्या आदेशान्वये श्रीमती अनुराधा खानविलकर, तत्कालिन अवर सचिव यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती सारथी पुणे येथील “वरिष्ठ प्रकल्प संचालक” या पदावर झाली होती. सदर प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजु होण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाने दिनांक २९/०७/२०२१(म.नं.)पासून कार्यमुक्त केले आहे. तद्नंतर श्रीमती अनुराधा खानविलकर, यांनी सारथी कंपनी,पुणे येथे “वरिष्ठ प्रकल्प संचालक” या पदावर रूजु करून घेण्याबाबत त्यांच्या दिनांक ३०/०७/२०२१ च्या अर्जान्वये छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था,(सारथी) पुणे यांना अर्ज केला होता.

२. श्रीमती अनुराधा खानविलकर,उप सचिव यांनी रूजु होण्यासाठी नियोजन विभागाचे आदेश जोडले नसल्याने तसेच त्या शिक्षण विभाग,कृषि विभाग,कौशल्य विकास विभाग,समाजकल्याण विभाग व सांख्यिकी व मूल्यमापन विभाग या विभागापैकी क्षेत्रियस्तरावरील अधिकारी नसल्यामुळे व्यवस्थापकीय संचालक, छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था,(सारथी),पुणे यांच्याकडुन त्यांच्या दिनांक ०२/०८/२०२१ च्या पत्रान्वये नियोजन विभागाकडे मार्गदर्शन मागितले. नियोजन विभागाकडुन दिनांक ०३/०८/२०२१ च्या पत्रान्वये सारथी संचालक मंडळाच्या बैठकीत श्रीमती अनुराधा खानविलकर,उप सचिव यांच्या प्रतिनियुक्ती बाबत निर्णय घेण्याबाबत कळविण्यात आले होते.

३. त्यानुसार सारथी कपंनीने दिनांक २८/०९/२०२१ च्या सारथी कपंनीच्या संचालक मंडळाच्या बैठकीत श्रीमती अनुराधा खानविलकर,उप सचिव यांना “वरिष्ठ प्रकल्प संचालक (कृषि)” या पदावर प्रतिनियुक्ती देण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला. प्रस्तुत निर्णयानुसार सारथी कपंनीकडुन श्रीमती अनुराधा खानविलकर,उप सचिव,सा.प्र.वि यांना दिनांक २२/१२/२०२१ पासुन “वरिष्ठ प्रकल्प संचालक (कृषि)” या पदावर रूजु करून घेण्यात आले. त्यामुळे श्रीमती अनुराधा खानविलकर,उप सचिव, सा.प्र.वि.यांना “वरिष्ठ प्रकल्प संचालक” या पदावर हजर करून घेण्यास प्रशासकीय कारणास्तव उशीर झालेला आहे. त्यामुळे श्रीमती अनुराधा खानविलकर, उप सचिव यांचा दिनांक ३०/०७/२०२१ ते २२/१२/२०२१ पर्यंतचा कालावधी हा महाराष्ट्र नागरी सेवा नियम १९८१ (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम ९(१४)(एफ) नुसार प्रतिक्षेचा कालावधी हा "कर्तव्य कालावधी" म्हणून नियमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय**

श्रीमती अनुराधा खानविलकर, उप सचिव यांचा प्रशासकीय कारणास्तव झालेला दि.३०/०७/२०२१ ते दि. २२/१२/२०२१ पर्यंतचा प्रतिक्षाधीन कालावधी हा महाराष्ट्र नागरी सेवा नियम १९८१(सेवेच्या सर्वसाधारण शर्ती)नियम ९ (१४) एफ नुसार "कर्तव्य कालावधी " म्हणून सर्व प्रयोजनार्थ (श्रीमती खानविलकर यांच्या सेवा विषयक बाबी संदर्भात) गणण्यात येत आहे.श्रीमती अनुराधा खानविलकर,उप सचिव यांचा दि.३०/०७/२०२१ ते दि. २२/१२/२०२१ पर्यंतच्या या "कर्तव्य कालावधी " मध्ये त्यांना देण्यात येणारे वेतन व त्या अनुषंगाने देण्यात येणारे भत्ते हे “छत्रपती शाहू महाराज संशोधन, प्रशिक्षण व मानव विकास संस्था (सारथी)”, पुणे यांनी त्यांच्याकडील सन २०२२-२३ च्या उपलब्ध निधीतुन भागविण्यात यावेत.

प्रस्तुत आदेश सामान्य प्रशासन विभागाने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३२४/सस-१४, दिनांक २३/०३/२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२२०४०७१३१७४०२३१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावाने व आदेशानुसार

Deepak Shivajirao Desai

Digitally signed by Deepak Shivajirao Desai
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d11b2ee4dfa01facc6e58028a3bde93d4ac81d87ed6247ca0fb3a827602426f, serialNumber=f3a85577333780db2d347fab235605a8c51e9cf8dc3339f64aba61827c8c000d, cn=Deepak Shivajirao Desai
Date: 2022.04.07 13:22:54 +05'30'

**(दी.शि.देसाई)**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती अनुराधा खानविलकर,उप सचिव,सा.प्र.वि.(सामान्य प्रशासन विभागा मार्फत)

**प्रत,**

१. मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुबंई.३२
२. अ.मु.स.(सेवा)यांचे स्वीय सहाय्यक महाराष्ट्र शासन मंत्रालय,मुबंई.३२
३. प्र.स.(नियोजन)यांचे स्वीय सहाय्यक महाराष्ट्र शासन मंत्रालय,मुबंई.३२
४ .सह सचिव (का.क्र.१४ व १९) सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुबंई
५. व्यवस्थापकीय संचालक,छत्रपती शाहू महाराज संशोधन ,प्रशिक्षण व मानव विकास संस्था, (सारथी) पुणे
६. निवड नस्ती (का.क्र.१४२५) नियोजन विभाग